**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेली १४ अस्थायी पदे सन २०२०-२०२१ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०३.२०/प्र.क्र.७७/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ सप्टेंबर, २०२०.

वाचावे :-

१. शासन निर्णय महसूल व वनविभाग क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१९/प्र.क्र.९६/फ-१ दिनांक १५.०३.२०१९.
२. शासन निर्णय महसूल व वनविभाग क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१९/प्र.क्र.९६/फ-१ दिनांक १७.१०.२०१९
३. शासन निर्णय महसूल व वनविभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र. ७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९
४. शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक १२.०२.२०२०
५. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र. ०९(१९-२०)/१७९०, दिनांक :- १८.०२.२०२०.
६. शासन निर्णय महसूल व वनविभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.२०/प्र.क्र.७७/फ-१ दिनांक ०३.०४.२०२०.
७. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक : ३१.०८.२०२०.

प्रस्तावना:-

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या १४ अस्थायी पदांना सन २०१९-२०२० मध्ये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यत चालू ठेवण्यास संदर्भ क्रमांक १ व २ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी प्रदान करण्यात आली होती.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या १४ अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ मध्ये दिनांक : ०१.०३.२०२० ते दिनांक : २८.०२.२०२१ पर्यंत चालू ठेवण्याचा प्रस्ताव मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केला होता.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक : ०१.०३.२०२० ते दिनांक : ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले होते त्यानुसार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या १४ अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ मध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक : ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती.

४. आता प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक : ०१.०९.२०२० ते दिनांक : २८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

I. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ७ च्या शासन निर्णयाच्या अधिन राहून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या १४ अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ मध्ये दिनांक : ०१.०९.२०२० ते दिनांक : २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

II. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या १४ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ - वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर) ०१-वनीकरण, १०१ वनसंधारण व विकास, १०१(०१) प्रशासन व संरक्षण, (०१) (०१) प्रशासन व संरक्षण ०१-वेतन (२४०६ ००९६) या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२८१२३२२५२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2020.09.28 12:34:10 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुर्व नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.२०/प्र.क्र.७७/फ-१, दिनांक -२५ सप्टेंबर, २०२० सोबतचे विवरणपत्र.**

**(दिनांक :- ०१.०९.२०२० ते दिनांक :- २८.०२.२०२१ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | उप वनसंरक्षक | २ |
| २ | सहायक वनसंरक्षक | २ |
| ३ | वनरक्षक | १ |
| ४ | मुख्य लेखापाल | ३ |
| ५ | सर्व्हेक्षक | २ |
| ६ | टपाल वाहक | १ |
| ७ | पाणीवाला | २ |
| ८ | सफाई कामगार | १ |
| **एकूण अस्थायी पदे** | | **१४** |

***********